## .. श्री दत्ताची आरती ..

त्रिगुणात्मक त्रयमूर्ती दत्त हा जाणा त्रिगुणी अवतार त्रैलोक्य राणा
नेती नेती शब्द न ये अनुमाना सुरवर मुनीजन योगी समाधिन ये ध्याना

जय देव जय देव जय श्रीगुरूदत्ता आरती ओवाळिता हरली भवचिंता
जय देव जय देव ..धृ..

सबाह्य अभ्यंतरी तू एक दत्त अभाग्यासी कैंची कळेल ही मात
पराहि परतली तेथे कैंचा हेत जन्म मरणाचाहि पुरलासे अन्त...2
.. जय देव जय देव जय श्रीगुरूदत्ता... ..

दत्त येऊनिया उभा ठाकला सदभावे साष्टांग प्रणिपात केला
प्रसन्न होउनि आशिर्वाद दिधला जन्म मरणाचा फेरा चुकविला...3
.. जय देव जय देव जय श्रीगुरूदत्ता... ..

दत्त दत्त ऐसे लागले ध्यान हरपले मन झाले उन्मन
मी तूं पणाची झाली बोळवण एका जनार्दनी श्रीदत्त ध्यान...4
.. जय देव जय देव जय श्रीगुरूदत्ता... ..